एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत अति तीव्र कमी वजनाच्या (SAM) बालकांना एनर्जी डेन्स न्युट्रीशियस फुड (EDNF) चा पुरवठा करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१७/प्र.क्र.१३०/का.५**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २५ सप्टेंबर, २०१८

वाचा :- १) महिला व बाल विकास विभाग शा.नि.क्र.एबावि-२०१६/प्र.क्र.४३ (भाग १ ब)/का.५, दिनांक ११ ऑगस्ट २०१७

२) महिला व बाल विकास विभाग शा.नि.क्र.एबावि-२०१६/प्र.क्र.३३१)/का.५, दिनांक २६ सप्टेंबर २०१७

३) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांचे पत्र क्र. एबाविसेयो/का.२/१७७८/२०१७, दिनांक १६/०६/२०१७

४) महिला व बाल विकास विभाग पत्र क्र. एबावि-२०१७/प्र.क्र.१३०/का.५,दिनांक १४ जुलै २०१७

५) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांचे पत्र क्र. एबाविसेयो/का.२/आवपो/EDNF/२०१८/२८७७,नवी मुंबई दिनांक ०४/०८/२०१८

६) राज्यस्तरीय खरेदी समितीची दिनांक ४/८/२०१८ रोजी दुपारी ३.०० वाजता आयोजित बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना :-**

आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई. यांनी एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत अति तीव्र कमी वजनाच्या (SAM) बालकांना **एनर्जी डेन्स न्युट्रीशियस फुड (EDNF)** चा पुरवठा करण्यासाठी प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव सादर केलेला होता. एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत अति तीव्र कमी वजनाच्या (SAM) बालकांना कुपोषणातून बाहेर काढण्यासाठी व राज्यातील बालकांमधील कुपोषणास आळा घालण्यासाठी शास्त्रीय पध्दतीने तयार केलेला विशेष **एनर्जी डेन्स न्युट्रीशियस फुड (EDNF)** आहाराचा पुरवठा करणेसाठी ई निविदा प्रकाशित करण्यास शासनाचे क्र.एबावि-२०१७/प्र.क्र.१३०/का-५, दिनांक १४ जुलै २०१७ पत्रान्वये मान्यता देण्यात आलेली होती. त्यानुसार शासनामार्फत निर्धारित केलेल्या अटी-शर्तीनुसार व शासनाच्या प्रचलित खरेदी धोरणानुसार ऑनलाईन पध्दतीने ई-निविदा दिनांक १७.०७.२०१७ रोजी आयुक्तालयाकडून प्रकाशित करण्यात आलेल्या आहेत.

२. ई निविदेच्या कार्यपध्दतीनुसार अमरावती, कोंकण व पुणे या महसुली विभागाकरीता महालक्ष्मी महिला औद्योगिक व बाल विकास बहुउद्देशिय संस्था ही निविदाधारक L१ घोषित झालेली आहे . औरंगाबाद व नागपुर या महसुली विभागाकरीता व्यंकटेश्वरा महिला औद्योगिक उत्पादक संस्था ही निविदाधारक L१ घोषित झालेला आहे तसेच नाशिक या महसुली विभागासाठी मारिया महिला बचत गट हा निविदाधारक L१ घोषित झालेली आहे.

३. मारिया महिला बचत गट या निविदाधारकाची आर्थिक उलाढाल ही फक्त एका महसुली विभागासाठीच पात्र असल्याचे कागदपत्र पडताळणी समितीच्या अहवालात नमुद आहे तसेच त्यांचे दर देखिल फक्त एका महसुली (नाशिक) विभागासाठी L१ प्राप्त झालेले आहेत. ई निविदेत एका निविदाधारकास जास्तीत जास्त २ महसुल विभागाचे कामकाज देण्यात यावे असे नमुद आहे तथापी लाभार्थींचे हित व योजनेच्या सुलभ अंमलबजावणीच्या दृष्ट्रीने महालक्ष्मी महिला औद्योगिक व बाल विकास बहुउद्देशिय संस्था या निविदाधारकास त्यांची आर्थिक क्षमता विचारात घेवुन ते L१ ठरलेल्या ३ महसुली विभागांसाठी EDNF आहार पुरवठयाचे कामकाज देणेबाबत प्रस्तावित करण्यात आले होते. दरांच्या वाटाघाटी करीता दिनांक ४/८/२०१८ रोजी L१ निविदाधारकांना राज्यस्तरीय प्रशासकिय विभाग खरेदी समिती समोर उपस्थित राहणेबाबत कळविण्यात आलेले होते. त्यानुसार सदर बैठकीत दरांबाबत वाटाघाटी करण्यात आलेल्या असुन तिन्ही निविदाधारकांनी सादर केलेल्या दरांपैकी न्युनतम प्राप्त दर रु. २६.८० (अक्षरी रुपये सव्वीस आणि ऐंशी पैसे मात्र सर्व करांसहित) याप्रमाणे एनर्जी डेन्स न्युट्रीशियस फुड (EDNF) आहाराचा पुरवठा करण्यास सर्व निविदाधारकांनी बैठकीत संमती दिलेली आहे. सदर दरानुसार लाभार्थ्यांचे हित व वेळेवर आहार पुरवठा होण्याच्या दृष्टीने **एनर्जी डेन्स न्युट्रीशियस फुड (EDNF)** आहार पुरवठयाचे कामकाज संबधित संस्थाना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत अति तीव्र कमी वजनाच्या (SAM) बालकांना कुपोषणातून बाहेर काढण्यासाठी व राज्यातील बालकांमधील कुपोषणास आळा घालण्यासाठी शास्त्रीय पध्दतीने तयार केलेला विशेष **एनर्जी डेन्स न्युट्रीशियस फुड (EDNF)** आहाराचा पुरवठा करण्यासाठी खालील संस्थाना ३ वर्षासाठी महसूल विभागनिहाय आहाराचा पुरवठा करण्यास केंद्र शासनाच्या व मा.न्यायालयाच्या आदेशाचे तसेच उद्योग उर्जा व कामगार विभागाच्या दिनांक १/१२/२०१६ च्या शासन निर्णयातील खरेदी धोरणाबाबतच्या तरतुदीचे तंतोतंत पालन होईल या अटींच्या अधीन राहुन शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | निविदाधारकाचे नाव | कामकाज वाटप करावयाचे महसुली विभाग | प्रति सॅचेट दर (९२ ग्रॅम) |
|---|---|---|---|
| १ | व्यंकटेश्वरा महिला औद्योगिक उत्पादक संस्था, उदगिर जि. लातुर | नागपुर व औरंगाबाद | रुपये २६.८० |
| २ | महालक्ष्मी महिला औद्योगिक व बाल विकास बहुउद्देशिय औ. सह. सो.लि., नांदेड. | पुणे, अमरावती व कोंकण | रुपये २६.८० |
| ३ | मारिया महिला बचत गट, उदगिर जि. लातुर | नाशिक | रुपये २६.८० |

२. संदर्भाधिन दिनांक ११ जुलै २०१७ व दिनांक २६ सप्टेंबर २०१७ मध्ये नमुद केल्याप्रमाणे सदर **एनर्जी डेन्स न्युट्रीशियस फुड (EDNF)** आहार अति तीव्र कमी वजनाच्या (SAM) बालकांना नियमित पोषण आहारा व्यतिरिक्त प्रतिदिन कमीतकमी एक व जास्तीत जास्त ३ सॅचेट देण्यात यावेत. **एनर्जी डेन्स न्युट्रीशियस फुड (EDNF)** आहाराचा डोस हा वय, वजन व उंची विचारात घेऊन वैद्यकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या सल्यानुसार देण्यात यावा.

हा शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.१२७/१४७२,दिनांक १३/८/२०१८ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२०२/व्यय-६, दिनांक २४/०९/२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१६१२४५४८२३३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशा नुसार व नावाने.

Vinita Ved Singal

Digitally signed by Vinita Ved Singal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bf34546cd1b83b57211a632b3065e76e8b0e2804e764de6b63b724785393c565, cn=Vinita Ved Singal
Date: 2018.10.16 12:48:55 +05'30'

**(विनीता वेद सिंगल )**
**सचिव, महिला व बाल विकास विभाग**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई
४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई
६) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
७) सर्व मंत्रालयीन विभाग
८) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
९) महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, नवी मुंबई
१०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
११) सर्व विभागीय आयुक्त
१२) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधानभवन, मुंबई
१३) सर्व जिल्हाधिकारी
१४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१५) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग
१६) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८) वित्त विभाग/व्यय-६, मंत्रालय, मुंबई
१९) नियोजन विभाग/का.१४७२, मंत्रालय, मुंबई
२०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२१) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
२२) सहायक संचालक (वित्त व लेखा), एबाविसेयो, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
२३) सर्व महिला व बाल विकास अधिकारी, (जिल्हा परिषद)

२४) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण / आदिवासी / नागरी)

२५) व्यंकटेश्वरा महिला औद्योगिक उत्पादक संस्था, उदगिर जि. लातुर

२६) महालक्ष्मी महिला औद्योगिक व बाल विकास बहुउद्देशिय औ. सह. सो.लि., नांदेड.

२७) मारिया महिला बचत गट, उदगिर जि. लातुर

२५) महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने

२६) निवड नस्ती (कार्यासन ५), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.